**० ते १०० हे.सिं.क्ष. प्रकल्पांच्या सर्वेक्षण कामांसाठी निधीचे वितरण: जि. पुणे**

(उर्वरित महाराष्ट्र विभाग)

**महाराष्ट्र शासन**

**मृद व जलसंधारण विभाग**

**शासन निर्णय क्र.सर्वेक्ष-२०२४/प्र.क्र.४१७/जल-४**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : ३१ मार्च, २०२५.

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४, दिनांक १२ फेब्रुवारी, २०२५ व १७ मार्च, २०२५.

२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे कार्यालयाचे पत्र जा.क्र. लेशा/**१२९४ व २९८९,** दिनांक २१ मार्च, २०२४ व दिनांक ११/०९/२०२४.

३) समक्रमांकित शासन ज्ञापन दिनांक ०८ नोव्हेंबर, २०२४.

**प्रस्तावना :** ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेच्या लघुसिंचन (जलसंधारण) प्रकल्पांच्या पुणे जिल्ह्यातील सर्वेक्षण कामांकरिता जुलै, २०२४ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये मागणी क्र.झेडएच-३, लेखाशीर्ष २७०२ ९२०१ खाली रुपये २.०० कोटी निधीची पुरवणी मागणी मंजुर करण्यात आली आहे. त्यानुसार पुरवणी मागणीद्वारे मंजुर असलेला निधी संदर्भीय क्र. २ येथील प्रस्तावामधील सर्वेक्षण कामांच्या शिल्लक मागणीसाठी देण्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**निर्णय :** **पुणे** जिल्ह्याच्या इंदापूर, दौंड, बारामती, खेड, मावळ, मुळशी, वेल्हे, पुरंदर व भोर तालुक्यातील संदर्भीय क्र. २ येथील प्रस्तावांमधील पात्र व परिपुर्ण सर्वेक्षण कामांची प्रलंबित देयके अदा करण्यासाठी **एकूण रुपये १.२० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी वीस लक्ष फक्त) एव्हढी** रक्कम वितरित करण्यासाठी याद्वारे, शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. वरील निधी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून वितरित करण्यात येत आहे :

अ) सर्वेक्षण कामांच्या मान्यता, कार्यारंभ आदेश, सर्व्हेक्षण अहवाल, नकाशे, क्षेत्र कार्यवृत्त इ. कागदपत्रे उपलब्ध असल्याची व सर्व कामे नियमानुसार झालेली असल्याची खातरजमा करावी,

ब) अन्वेक्षणासंदर्भातील आवश्यक बाबी (Trial Pit / Core Logging Report) यांची पूर्तता झाली असल्याची देखील खातरजमा करुन घेण्यात यावी,

क) मोजमाप पुस्तिकेतील नोंदी तपासून मागणी केलेली रक्कम वाजवी असल्याची तसेच संबधित कामांना दुबार निधीचे वितरण होत नसल्याची खातरजमा करुन घेण्यात यावी,

ड) मंजूर किंमतीपेक्षा जास्तीची रक्कम वितरित करण्यात येवू नयेत,

ई) कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर अखर्चित रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पित करावी,

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र.झेडएच-३,
२७०२, लहान पाटबंधारे
८०, सर्वसाधारण
००५, अन्वेक्षण
(०१) सर्वेक्षण
(०१) (०१) ० ते १०० हेक्टर सिंचन क्षमतेपर्यंतच्या पाटबंधारे योजनांचे सर्वेक्षण
(कार्यक्रम) (२७०२ ९२०१)
२७, लहान बांधकामे

५. उपरोक्त खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतीस्वाक्षरीत प्रती विहित मार्गाने शासनास सादर कराव्यात.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग यांची राहिल व अप्पर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेले हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आहेत. त्यांचा संकेताक २०२५०३३१२३३३०५०६२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.31 23:33:58 +05'30'

**(रा.हे.बागडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अप्पर आयुक्त, मृद व जलसंधारण, प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे
३) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे.
४) महालेखापाल-२, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा) नागपुर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.

६) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती / जल-४.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. विरोधीपक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे कार्यालय.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फ़त संबधित ल.सिं.(जसं) उपविभागिय अभियंता).
५. सचिव (मृद व जलसंधारण) यांचे स्वीय सहायक.
६. आयुक्त, मृद व जलसंधारण, छ. संभाजीनगर.